**ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-
दुरुस्तीबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: १७ ऑक्टोबर, २०१४.

वाचा :

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापापु-१०९८/प्र.क्र.२११/पापु-०७, दिनांक १४ डिसेंबर, १९९८
२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापापु-१०९९/प्र.क्र.३२८/पापु-०७, दिनांक २७ जुलै, २०००.
३) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापापु-१००२/प्र.क्र.६३९/पापु-०७, दिनांक २२ मे, २००३
४) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापापु-१००३/प्र.क्र.२५६/पापु-०७, दिनांक १० जुलै, २००६
५) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापापु-१००३/प्र.क्र.२५६/पापु-०७, दिनांक १२ ऑक्टोबर, २००६
६) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापापु-१००७/प्र.क्र.२३३/पापु-०७, दिनांक २० मे, २००८
७) **शासन निर्णय क्रमांकः** देप्रोअ-१३०९/प्र.क्र.६९/पापु-०७, दिनांक १७ ऑगस्ट, २००९
८) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११०९/प्र.क्र.१०४ (अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०
९) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-११११/प्र.क्र.५०/पापु-०७, दिनांक २० एप्रिल, २०१२
१०) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४

प्रस्तावना :

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या धोरणानुसार योजनेची निवड, आखणी, अंमलबजावणी ही संबंधीत गावाच्या ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीने करावयाची असून, योजनेच्या देखभाल दुरुस्तीवरील १०० टक्के खर्च संबंधित लाभार्थ्यांनी करावयाचा आहे. शासन यंत्रणेचा देखभाल-दुरुस्तीमधील सहभाग हा सहाय्यकर्त्याचा राहणार आहे.

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची १०० टक्के देखभाल दुरुस्ती ग्रामस्थांनीच स्व:खर्चाने करावी व त्यासाठी त्यांनी पाणीपट्टीद्वारे निधी उपलब्ध करून घ्यावा यासाठी पाणीपट्टी वरील कमाल मर्यादा काढून टाकण्यात आली आहे. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या वार्षिक देखभाल दुरुस्ती खर्चाचा अंदाज घेऊन त्यानुषंगाने पाणीपट्टीची आकारणी करणे, आकारलेल्या पाणीपट्टीची जास्तीत जास्त वसुली होईल यासाठी प्रयत्न करणे ही संबंधित जिल्हा परिषद/ ग्रामपंचायतीची जबाबदारी आहे, जेणेकरून योजना स्वयंसंतुलित होतील.

दिनांक १७ मार्च, २०१० व दिनांक ०९ जुलै, २०१४ रोजीच्या शासन निर्णयांन्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजना पूर्ण झाल्यानंतर किमान एक वर्ष योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक करण्यात आले आहे. त्यानंतर पाणी पुरवठा योजनेच्या देखभाल दुरुस्तीची जबाबदारी ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीची राहणार आहे.

ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समित्यांची आर्थिक कुवत, साधन सामुग्रीची असलेली कमतरता, पूरक व योग्य माहितीचा अभाव, अयोग्य संरचना, देखभाल कर्मचाऱ्यांचा अभाव, अवैध नळ जोडण्या, कर्मचाऱ्यांना अपुरे प्रशिक्षण, कार्यक्षमतेच्या मुल्यमापनाचा व नियमित सनियंत्रणाचा अभाव, प्रतिबंधक देखभालीवर पुरेसे लक्ष न देणे, देखभाल दुरुस्ती मार्गदर्शिका उपलब्ध नसणे, जागेवरील वास्तविक माहितीचा अभाव असणे हे मुद्दे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निकृष्ट देखभाल दुरुस्तीस कारणीभूत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी सुस्पष्ट धोरण, कायदेशीर चौकट, निश्चित जबाबदाऱ्या ठरविण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्षम व परिणामकारकरित्या कार्यान्वित राहण्यासाठी शुद्ध पाणी पुरवठ्याचा जल सुरक्षा आराखडा (Water Security Plan) तयार करणे, देखभाल-दुरुस्तीचा वार्षिक जमा खर्च अद्ययावत ठेवणे, देखभाल-दुरुस्तीसाठी विविध स्तरावरील जबाबदाऱ्यांची निश्चिती करणे, जबाबदाऱ्या पार पाडण्याचा कालावधी व त्याची वारंवारिता निश्चित करणे, सेवा पुरवठा सुधारणा व सातत्य यासाठी भविष्यातील गुंतवणुकीची व्यवस्था करणे या बाबींवर लक्ष देणे नितांत गरजेचे झाले आहे.

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे सातत्य राखण्यासाठी लोकसहभागातून पाणी पुरवठा योजनांची देखभाल व दुरुस्ती सहज शक्य आहे, परंतु बहुतांशी पाणी पुरवठा योजनांच्या बाबतीत या क्षेत्राकडे मात्र दुर्लक्ष झाले आहे. ही अत्यंत महत्वाची बाब विचारात घेऊन आणि गत १०-१२ वर्षातील कार्यक्रमाच्या पद्धतीवर आधारित अनुभवांना समोर ठेऊन देखभाल व दुरुस्तीबाबत सुधारित मार्गदर्शक सुचना पारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

प्रस्तावनेत नमूद केलेली पार्श्वभूमी व संदर्भातील सर्व बाबींचा विचार करून पुढील सुचनांनुसार ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी देखभाल- दुरुस्तीची प्रक्रिया राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर सूचना या अंमलबजावणी यंत्रणांना बंधनकारक स्वरूपाच्या नसून त्या मार्गदर्शक स्वरूपाच्या आहेत. ग्राम पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीची मुख्य जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणांची/ पाणी पुरवठा व स्वच्छता समित्यांची असल्याने या यंत्रणा/ समित्या त्यांची स्वतंत्र देखभाल-दुरुस्तीची प्रक्रिया राबवू शकतात अथवा खालील मार्गदर्शक सूचनांचा पर्याय स्वीकारू शकतात.

### (१) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीची जबाबदारी :

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीची जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची राहणार आहे. ग्राम पाणी पुरवठा योजना पुर्णत्वानंतर किमान एक वर्ष ही योजना चालविणे

कंत्राटदारावर बंधनकारक आहे. योजना पुर्णत्वानंतर सदर योजना ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीस/ संयुक्त समितीस/ शिखर समितीस हस्तांतरित करणे आवश्यक राहील. योजना हस्तांतरणानंतर योजनेच्या देखभाल दुरुस्तीची जबाबदारी संबंधित समितीची राहील. ग्रामीण पाणी पुरवठा योजना संबंधित समितीकडे हस्तांतरित न झाल्यास त्या योजनेची देखभाल दुरुस्ती करण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

**(२) जिल्हास्तरीय देखभाल व दुरुस्ती निधी :**

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी दिनांक १७ नोव्हेंबर, १९८६ च्या आदेशान्वये जिल्हा परिषद स्तरावर जिल्हा देखभाल दुरुस्ती निधीची स्थापना करण्यात आली आहे. तसेच दिनांक १७ ऑगस्ट, २००९ रोजीच्या शासन निर्णयानुसार ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीसाठी राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाखाली उपलब्ध होणाऱ्या केंद्रीय अनुदानाच्या १५ टक्के निधी व तेवढाच राज्य शासनाचा निधी राज्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीसाठी उपलब्ध करून देण्याची तरतूद करण्यात आली आहे. सध्या हा निधी राज्यस्तरावर उपलब्ध असून, जिल्हा परिषदांकडील मागणीनुसार या निधीचे वितरण (प्रतिपूर्ती) केले जाते. या पद्धतीमध्ये बदल करून शासन स्तरावर उपलब्ध होणाऱ्या एकूण देखभाल-दुरुस्तीच्या निधीचे वितरण सर्व जिल्हा परिषदांना मंजूर वार्षिक कृती आराखड्याच्या रकमेच्या प्रमाणात थेट करण्यात येईल. हा निधी जिल्हा देखभाल दुरुस्ती निधीमध्ये जमा करण्यात यावा.

जिल्हा देखभाल-दुरुस्ती निधीमध्ये जिल्हा परिषदांनी त्यांच्या एकूण उत्पन्नाच्या किमान २०% रक्कम जमा करणे बंधनकारक आहे. सदर २० टक्के रक्कम जिल्हा देखभाल व दुरुस्ती निधीत भरण्यासाठी जिल्हा परिषदेचे एकूण उत्पन्न परीगणित करताना एकूण उत्पन्नात पिण्याच्या पाण्यावरील पाणीपट्टी व त्यानुषंगाने जमा होणारी रक्कम वगळून जो उर्वरित निधी असेल, त्याच्या २० टक्के रक्कम जिल्हा देखभाल-दुरुस्ती निधीत जमा करावी.

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची देखभाल-दुरुस्ती ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती/ शिखर समिती/ संयुक्त समितीमार्फत करण्यात येणार असेल तरच पाणीपट्टीची रक्कम ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीच्या/शिखर समितीच्या/ संयुक्त समितीच्या खात्यावर जमा राहील अन्यथा पाणीपट्टीची संपूर्ण रक्कम जिल्हा देखभाल-दुरुस्ती निधीमध्ये जमा करण्यात येईल.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत देखभाल दुरुस्ती करण्यात येणाऱ्या योजनांच्या बाबतही पाणीपट्टी व शासन अनुदानाची रक्कम संबंधित जिल्हा देखभाल-दुरुस्ती निधीतच जमा राहील. सदर रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास जिल्हा परिषदांमार्फत वितरीत करण्यात येईल.

जिल्ह्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीवर व जिल्हा देखभाल-दुरुस्ती निधीवर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे नियंत्रण राहील.

### (३) प्रशिक्षण :

ग्राम पाणी पुरवठा योजनांची देखभाल दुरुस्ती नियमितपणे व स्थानिकरित्या व्हावी यासाठी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी/ समित्यांनी त्यांचेकडील कर्मचाऱ्यांना व अधिकृत स्थानिक नळजोडणीकार (Authorised Plumber) यांना योजनेच्या देखभाल-दुरुस्तीचे प्रशिक्षण द्यावे.

### (४) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीमध्ये अंतर्भूत होणारी कामे :

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्ती अंतर्गत परिशिष्ट-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कामे हाती घेण्यात येतील.

### (५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीकरीता अवलंबावयाची कार्यपद्धती :

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी खालील कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात यावा:-

१) जिल्ह्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे सर्वेक्षण करून देखभाल दुरुस्ती आवश्यक असणाऱ्या योजनांचा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांनी आढावा घ्यावा.

२) ज्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची देखभाल-दुरुस्ती करावयाची आहे त्या योजनांच्या देखभाल दुरुस्तीचा कृती आराखडा तयार करून त्यास जिल्हा जलव्यवस्थापन समितीची मान्यता घ्यावी.

३) जिल्ह्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीच्या प्रशासकीय मान्यतेचे योजनानिहाय आदेश मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्यामार्फत निर्गमित करण्यात येतील.

४) तदनंतर योजनेच्या देखभाल-दुरुस्तीच्या कामास प्रत्यक्ष सुरुवात करण्यात येईल. देखभाल-दुरुस्तीचे आराखडा निहाय काम एक वर्षात पूर्ण करणे आवश्यक राहील.

### (६) योजनांची देखभाल-दुरुस्ती व व्यवस्थापन खाजगी यंत्रणा/कंत्राटदाराकडून करण्याबाबत :

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजना पूर्ण झाल्यानंतर व यशस्वी चाचणी दिल्यानंतर योजना स्वतंत्र स्वरुपाची असल्यास संबंधित ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीकडे/ अंमलबजावणी यंत्रणेकडे व प्रादेशिक स्वरुपाची असल्यास संबंधित शिखर/संयुक्त समितीकडे अथवा अंमलबजावणी यंत्रणेकडे देखभाल-दुरुस्ती व व्यवस्थापनासाठी सोपविली जाते. अनेक स्थानिक स्वराज्य संस्था या योजनांची देखभाल-दुरुस्ती व व्यवस्थापन योग्य प्रकारे करीत नाहीत. तसेच अनेक स्थानिक स्वराज्य संस्थांकडे योजना चालविण्यासाठी कुशल व अनुभवी कर्मचारी नसल्याचे निदर्शनास आले आहे. त्याचप्रमाणे स्थानिक जनतेकडून योग्य प्रमाणात पाणीपट्टी वसूल करून त्यातून योजनेची देखभाल-दुरुस्ती व व्यवस्थापन करणे बऱ्याच स्थानिक स्वराज्य संस्थाना झेपत नाही. या बाबी लक्षात घेता जिल्हा जलव्यवस्थापन समितीच्या मान्यतेनंतर संबंधित ग्राम पाणी पुरवठा योजनांची देखभाल-दुरुस्ती खाजगी यंत्रणा/ कंत्राटदाराकडून करून घेण्याची मुभा संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना/ समित्यांना राहील.

ग्राम पाणी पुरवठा योजनांची देखभाल दुरुस्ती खाजगी यंत्रणा/ कंत्राटदाराकडून खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येईल.

१) योजनांची देखभाल दुरुस्ती खाजगी यंत्रणा/ कंत्राटदाराकडे सोपविण्यासाठी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेच्या/ समितीच्या प्रशासकीय प्रमुखाने खाजगी यंत्रणा/ कंत्राटदारासोबत करारपत्र करणे बंधनकारक राहील.

२) करारपत्रामध्ये देखभाल-दुरुस्ती करावयाच्या बाबींची जबाबदारी, कालावधी, निधीची उपलब्धता, पाणीपट्टीची वसुली व इतर महत्वाच्या अटींचा स्पष्ट उल्लेख असावा.

३) योजना चालविण्यासाठी लागणाऱ्या खर्चाचा कोणताही अतिरिक्त भार शासनावर पडणार नाही याची दक्षता घ्यावी.

**(७) पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीचे प्रस्ताव मंजूर करण्यापूर्वी पूर्तता करावयाच्या बाबी :**

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीचे प्रस्ताव जिल्हा जलव्यवस्थापन समितीसमोर सादर करण्यापूर्वी खालील बाबींची पूर्तता करणे बंधनकारक राहील:-

१) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांनी दुरुस्ती करावयाच्या पाणी पुरवठा योजनेचा स्वत: निरीक्षण करून दिलेला स्थळ निरीक्षण अहवाल.

२) दुरुस्ती करावयाच्या बाबींची सविस्तर अंदाजपत्रके

३) पाणी पुरवठा योजनेची दुरुस्ती कोणत्या परिस्थिती मुळे उद्भवली याची कारणमिमांसा

४) दुरुस्ती करावयाच्या बाबींच्या खर्चाचा व उपलब्ध निधीचा तपशील

५) योजनेच्या दुरुस्तीचा खर्च कोणत्याही परिस्थितीत उपलब्ध निधीपेक्षा अधिक असणार नाही.

**(८) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीकरीता निधी वितरण :**

जिल्हा जलव्यवस्थापन समितीच्या मंजुरीनंतर संबंधित योजनांच्या देखभाल-दुरुस्तीकरिता अंमलबजावणी यंत्रणांना/ समित्यांना जिल्हा देखभाल-दुरुस्ती निधीमधून निधी वितरीत करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी, जिल्हा परिषद यांची राहील. ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समित्यांना/ शिखर समित्यांना/ संयुक्त समित्यांना/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देखभाल-दुरुस्तीसाठी निधी वितरीत करताना या समित्यांकडे जमा असलेल्या पाणीपट्टीचा आढावा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी घ्यावा. देखभाल-दुरुस्तीकरिता शासनाकडून कोणत्याही स्वरूपाचा अतिरिक्त/ वेगळा निधी उपलब्ध करून दिला जाणार नाही. त्यामुळे संबधित यंत्रणांनी त्यांच्याकडील देखभाल दुरुस्तीच्या कामांचा आढावा घेऊनच देखभाल-दुरुस्तीची कामे हाती घ्यावीत.

**(९) ग्राम पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीकरिता स्वतंत्र अर्थसंकल्प तयार करणे :**

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्ती व व्यवस्थापनाकरिता पुरेसा निधी उपलब्ध व्हावा व देखभाल-दुरुस्तीकडे काटेकोर लक्ष देता यावे, यासाठी योजनांच्या देखभाल-दुरुस्तीचा सविस्तर अर्थसंकल्प तयार करण्यात यावा.

दिनांक १७ ऑगस्ट, २००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरील एकूण देखभाल दुरुस्ती निधीच्या वितरणाचे निकष ठरविण्यात आले आहेत. दिनांक १७ ऑगस्ट, २००९ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदी या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत. जिल्ह्यातील सर्व ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीवर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे नियंत्रण असल्यामुळे शासनस्तरावर देखभाल-दुरुस्तीच्या निधी वितरणासाठी स्वतंत्र निकष ठेवण्याची तसेच शासनास प्रस्ताव सादर करण्याची आवश्यकता नाही. जिल्ह्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीमध्ये प्राधान्यक्रम ठरवून देखभाल-दुरुस्तीची कामे हाती घेण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना देण्यात येत आहेत.

दिनांक २० एप्रिल, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम योजना नुतनीकरण निधीबाबत मार्गदर्शक सुचना पारित करण्यात आल्या आहेत. या शासन निर्णयान्वये दिनांक २० एप्रिल, २०१२ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून, योजना नुतनीकरण निधीची तरतूद रद्द करण्यात येत आहे. या तरतुदीन्वये जिल्हा परिषदांकडे उपलब्ध असलेला संपूर्ण योजना नुतनीकरण निधी जिल्हा देखभाल-दुरुस्ती निधीमध्ये वर्ग करण्यात यावा व या निधीचा वापर केवळ ग्राम पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीसाठीच करण्यात यावा.

जिल्हा देखभाल-दुरुस्ती निधीमध्ये जमा होणाऱ्या एकूण रकमेपैकी ५० टक्के रक्कम ही जिल्ह्यातील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या वीज बिलाची ५० टक्के प्रतिपूर्ती करण्यासाठीच वापरण्यात येईल. उर्वरित ५० टक्के निधीमधून योजनेच्या देखभाल दुरुस्तीची कामे हाती घेण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201410161754314028 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2014.10.18 15:22:42 +05'30'

**(अजय सावरीकर)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ००३२
२. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई

४. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५. मा.मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
८. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई-४०० ०२१.
९. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
११.विभागीय आयुक्त (सर्व),
१२.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१३.मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व), जिल्हा परिषद.
१४.संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१५.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१६.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१७.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१८.मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९.अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
२०.कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२१.मंत्रालयीन इतर सर्व विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये
२२.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
२३.निवडनस्ती, कार्यासन पापु-०७.

**कृ.मा.प.**

(शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु०-०७, दिनांक १७ ऑक्टोबर,२०१४ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट-१

## ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्ती अंतर्गत करावयाची कामे :-

१) उद्धभवाच्या ठिकाणी आवश्यकतेनुसार दुरुस्त्या करणे.

२) पाणी पुरवठा योजनेचे निकामी/ नादुरुस्त झालेली पंपिंग मशिनरी बदलणे/दुरुस्त करणे.

३) ऊर्ध्वनलिका/ गुरुत्वनलिका इत्यादी मधील नादुरुस्त झालेली पाईपलाईन बदलणे/ दुरुस्त करणे.

४) साठवण टाकीची दुरुस्ती करणे/ साठवण टाकीचे बळकटीकरण करणे/ पुरेशा दाबाने पाणी पुरवठा करण्यासाठी नवीन साठवण टाकी बांधणे.

५) वितरण व्यवस्थेतील नादुरुस्त झालेले पाईप बदलाने/ दुरुस्त करणे किंवा मोठ्या व्यासाचे पाईप टाकणे.

६) विद्युत दाबाच्या उपलब्धतेनुसार ट्रान्सफॉर्मर/ कपॅसिटर बसविणे.

७) उपरोक्त कामांव्यतिरिक्त जिल्हा जल व्यवस्थापन समितीस आवश्यक वाटणारी दुरुस्तीची कामे घेणे.

८) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या थकीत/ चालू वीज देयकांची ५० टक्के अदायगी करणे.

९) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल-दुरुस्तीसाठी आवश्यकतेनुसार अद्ययावत तंत्रज्ञानाचा (Advanced Technology) वापर करणे.

*********